मे.कोस्टल गुजरात पॉवर.लि. (M/s.CGPL) या कंपनीबरोबर पूरक वीज खरेदी करार करण्यास महावितरण कंपनीस मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग

**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०१८/प्र.क्र.२४०/ऊर्जा-५**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : १३ ऑगस्ट, २०२०.

**प्रस्तावना :**

मे.कोस्टल गुजरात पॉ.लि. (M/s. Costal Gujarat Power Limited) हा मुंद्रा, गुजरात येथे ४१५० मे.वॅ. (नेट कॅपासिटी ३८०० मे.वॅ.) क्षमतेचा औष्णिक वीज प्रकल्प आहे. सदर प्रकल्पाची उभारणी व देखभाल टाटा ग्रुप तर्फे करण्यात येत आहे. सदर प्रकल्पातून निर्माण होणारी वीज गुजरात (१८०५ मेवॅ ), राजस्थान (३८० मेवॅ), पंजाब (४७५ मेवॅ), हरियाना (३८० मेवॅ) व महाराष्ट्र (७६० मेवॅ) या राज्यांना वीज खरेदी कराराव्दारे विक्री करण्यात येते. सदर प्रकल्पातून महाराष्ट्र राज्यासाठी महावितरण कंपनीने ७६० मे.वॅ. वीजेसाठी दिनांक २२.०४.२००७ रोजी दिर्घ मुदतीचा करार केला असून त्याचा समतल दर ( Levellised Tariff) रुपये २.२६ प्रती युनिट इतका आहे.

२. सदर प्रकल्पासाठी लागणाऱ्या आयात कोळशाकरिता मे.कोस्टल गुजरात पॉ.लि. (M/s.CGPL) ने इंडोनेशियन कोळसा खाणीसोबत दिनांक ३१.१०.२००८ रोजी इंधन पुरवठा करार केला. इंडोनेशियन सरकारने दिनांक २३.०९.२०१० रोजी इंडोनेशियन मधील कोळसा खाणींनी, निर्यात होणारा कोळसा एका विशिष्ट आंतरराष्ट्रीय बेंच मार्क किंमतीने विक्री करण्याबाबत आदेश पारित केले. आंतरराष्ट्रीय कोळसा विक्रीचे दर वाढत असल्याने मे.कोस्टल गुजरात पॉवर लि.ने (M/s.CGPL) उपरोक्त राज्यांबरोबर केलेल्या वीज खरेदी करारातील वीजदर वाढीसाठी केंद्रीय विद्युत नियामक आयोगाकडे (CERC-Central Electricity Regulatory Commission) याचिका दाखल केली होती. सदर याचिकेच्या आदेशाविरुध्द ॲपटेल व मा.सर्वोच्च न्यायालयामध्ये ग्राहक प्रतिनिधी संघटना व वीज खरेदीदार कंपन्या यांच्यामार्फत याचिका दाखल करण्यात आल्या. याबाबत योग्य तोडगा काढण्याकरिता गुजरात राज्याने उच्चस्तरिय समिती (High Power Committee) स्थापन केली. सदर उच्चस्तरीय समितीच्या शिफारशीच्या अनुषंगाने वीज खरेदीदार कंपन्यांनी सुधारित वीज खरेदीकरार सीईआरसी मार्फत करण्याचे आदेश मा.सर्वोच्च न्यायालयाने दिनांक २९.१०.२०१८ रोजी दिले. तद्नंतर दिनांक १८.०६.२०२० रोजी मा.मुख्य सचिवांसोबत झालेल्या चर्चेत मा.मुख्य सचिवांनी सुचित केल्याप्रमाणे सर्व वीज खरेदीदार राज्यांची संयुक्तपणे एकसमान दराने, समान अटी व शर्तीसहित पुरक वीज खरेदी करार करण्यास सहमती असल्यास केंद्रीय विद्युत नियामक आयोगाच्या मान्यतेच्या अधिन राहून महाराष्ट्र राज्य पुरक वीज खरेदी करार करण्यास सहभागी होईल या अटीवर आवश्यक कार्यवाही करण्याबाबत महावितरण कंपनीस सुचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:**

१. मे.कोस्टल गुजरात पॉवर लि. (मे.सीजीपीएल) या वीज निर्मिती प्रकल्पा संदर्भात उच्चस्तरीय समितीच्या शिफारशी विचारात घेता, सर्व वीज खरेदीदार राज्यांची संयुक्तपणे एकसमान दराने, समान अटी व शर्तीसहित पुरक वीज खरेदी करार करण्यास सहमती असल्यास केंद्रीय विद्युत नियामक आयोगाच्या मान्यतेच्या अधिन राहून महावितरण कंपनीद्वारे पुरक वीज खरेदी करार करण्यास तत्वत: मान्यता देण्यात येत आहे. प्रत्यक्ष पुरक वीज खरेदी करार करण्यापूर्वी शासनाची मान्यता घेण्यात यावी.

२. वरील निर्णयानुसार पुढील आवश्यक ती कार्यवाही महावितरण कंपनीमार्फत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १६४३ दि. ०३.०८.२०२० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००८१३१२३९५६७९१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Prashant Pundlik Badgeri

Digitally signed by Prashant Pundlik Badgeri
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Industry Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=07ae22a8e7fa4047ce6ff816d85e77eec14db9926b325a140acf9b28bb990786, serialNumber=ec955e2d360e1fddb6abac58a907419053beeceb5dbac48a78c89c588ff71bef, cn=Prashant Pundlik Badgeri
Date: 2020.08.13 12:45:30 +05'30'

**( प्र. पुं. बडगेरी )**
**शासनाचे उपसचिव**

**प्रत:**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४. मा. मंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ सचिवालय,विधानभवन, मुंबई.
६. मा. राज्यमंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
७. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव (वित्त ) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव (विधी व न्याय), विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. सर्व मंत्रालयीन विभाग
१२. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
१३. निवड नस्ती (ऊर्जा-५), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने.